GR-2004(006)2085 7002-1201

आदिवासी भागात लहान उपसा सिंचन योजना राबविण्याबाबत व त्यामध्ये स्वयंसेवी संस्थांचा तसेच सहकारी संस्थांचा सहभाग.

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास व जलसंधारण विभाग,

शासन निर्णय, क्रमांक-उसियो 1093/प्र.क्र.182/93/जल-2-अ,

मंत्रालय, मुंबई-400 032, दिनांक 3 फेब्रुवारी 1994.

वाचा :- (1) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्रमांकः एलआयएस 1088/399/88/खारभूमी, दिनांक 6 जानेवारी 1990.

(2) शासन पत्र, पाटबंधारे विभाग, क्रमांकः एलआयएस 1088/399/88/खारभूमी, दिनांक 3 मार्च 1990 व समक्रमांकित पत्र दिनांक 5 जून, 1990.

(3) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्रमांकः मापदं 1092/450/92/लपा-2, दिनांक 11 ऑक्टोबर 1993.

(4) शासन परिपत्रक, आ.वि.वि. क्र.पाबंवि 1690/प्र.क्र.86/का.9, दिनांक 12 जून 1990.

(5) शासन परिपत्रक, आ.वि.वि. क्र.पाबंवि 1690/प्र.क्र.86/का.9, दिनांक 12 फेब्रुवारी 1992.

**शासन निर्णय**

आदिवासी भाग हा सर्वसाधारणपणे डोंगराळ भाग असून तो धरणाच्या वरच्या पाणलोट क्षेत्रात येत असल्याने आदिवासींना धरणातील पाण्याचा सिंचनासाठी मोठया प्रमाणात लाभ मिळत नाही. लघुपाटबंधारे योजनांमुळे काही भागात हंगामी सिंचनाचा फायदा होतो. परंतु पठारावर कोणत्याही प्रकारच्या सिंचन सोयी उपलब्ध नसतात. त्यामुळे, आदिवासींच्या विकासासाठी आदिवासी उपयोजना क्षेत्रामध्ये लहान परंतु अर्थक्षम अशा उपसा सिंचन योजना (किमान 25 हेक्टर पावेतो सिंचन क्षेत्र असलेल्या) शासन खर्चाने बांधून देणे व त्यानंतर त्या लाभधारकांच्या सहकारी संस्थांकडे हस्तांतरित करण्याबाबत सविस्तर सूचना शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्र.एलआयएस 1088/399/88/खारभूमी, दिनांक 6 जानेवारी 1990 अन्वये निर्गमित करण्यात आल्या. मध्यंतरीच्या काळात जलसंधारण विभागाची निर्मिती करण्यात येऊन त्या विभागाकडे 250 हेक्टर पावेतोच्या सिंचन क्षमता असणा-या लघुपाटबंधारे योजना वर्ग करण्यात आल्या. आदिवासी भागात लहान उपसा सिंचन योजना राबविण्याबाबत काय कार्यपध्दती असावी याबाबत सविस्तर सूचना शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग, क्रमांकः पाबंवि 1690/प्र.क्र.86/का.क्र.09, दिनांक 12 फेब्रुवारी 1992 अन्वये निर्गमित करण्यात आल्या. आदिवासी उपयोजना क्षेत्रामध्ये लहान उपसा सिंचन योजना स्वयंसेवी संस्थांमार्फत किंवा सहकारी संस्थांमार्फत राबविण्याबाबतही प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. जलसंधारण विभागाची निर्मिती झाल्यानंतर त्याही विभागांतर्गत कांही जिल्ह्यांत कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे (स्थानिक स्तर) ही पदे निर्माण करण्यात आली. तसेच त्यावर तांत्रिक व प्रशासनिक देखरेख करण्यासाठी प्रत्येक महसूली विभागात अधिक्षक अभियंता, लघुपाटबंधारे (स्थानिक स्तर) मंडळ ही पदेही निर्माण करण्यात येऊन, जलसंधारण विभागांतर्गत मुख्य अभियंता, लघुपाटबंधारे (स्थानिक स्तर) पुणे, हेही पद निर्माण करण्यात आले आहे. या सर्व गोष्टींचा विचार करुन शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग, क्र.पाबंवि 1690/प्र.क्र.86/09, दिनांक 12 फेब्रुवारी 1992 निष्प्रभावित करुन ( supercede ) खालील सुधारित आदेश निर्गमित करण्यात येत आहेत:-

2. <u>मार्गदर्शक सूत्रे</u>:- आदिवासी उपयोजना क्षेत्रामध्ये उपसा सिंचन योजना राबविण्याबाबत खालील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करण्यात यावा :-

(अ) प्रत्येक एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्पा ( I.T.D.P ) मध्ये योग्य जागा असेल व मागणी असेल तर किमान एक उपसा सिंचन योजना शासकीय खर्चाने घ्यावी. मागणी असेल व आवश्यक अटी व निकष पूर्ण होत असतील तर एकापेक्षा जास्त उपसा सिंचन योजना घेण्यास हरकत नाही.

(ब) या योजनेचे लाभक्षेत्र किमान 25 हेक्टर असावे.

(क) सदर लाभार्थ्यांच्या सहकारी संस्थांमध्ये कमीत कमी 90% लाभार्थी हे आदिवासी असावेत.

काही उपसा सिंचन योजनांमध्ये लाभार्थ्यांची संख्या [redacted] कमी असल्याने अशा संस्था पंजीबध्द करणे शक्य होणार नाही. अशा परिस्थितीत लाभार्थ्यांनी समूह तयार करुन उपसा सिंचन योजनेची दुरुस्ती/देखभाल व पाणी वाटपाबाबत हमी दिल्यास अशाही योजना शासकीय खर्चाने कार्यान्वित करुन देता येऊ शकतील. परंतु काही लाभार्थ्यांच्या समुहात कमीत कमी 90% लाभार्थी हे आदिवासी असावयास हवेत. अशाच काही प्रकरणात जर संबंधित गांवची ग्रामपंचायत/गट ग्रामपंचायत सदर योजनेच्या दुरुस्ती देखभाल व पाणी वाटपाची जबाबदारी घ्यावयास तयार असेल तर अशी योजना ग्रामपंचायतीसही हस्तांतर करावयास हरकत नाही.

(ह) अशा लहान उपसा सिंचन योजना आदिवासी उपयोजना क्षेत्रामध्ये घेण्याकरिता प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी योजनेस प्रसिध्दी देऊन लाभार्थ्यांची सहकारी संस्था स्थापन करुन ती पंजीबध्द करुन घेण्याची कार्यवाही करावी.

(इ) शासनाच्या खर्चाने उपसा सिंचन योजना घेण्यापूर्वी पुढील अटींची पूर्तता करणे आवश्यक राहील:-

1) आदिवासी उपयोजना क्षेत्रामध्ये विशिष्ट ठिकाणी उपसा सिंचन योजना बांधण्यासाठी संबंधित लाभधारकांना प्रथम त्या जिल्ह्यातील बांधकाम करणा-या पुढील अधिका-यांकडे मागणी करावी लागेल.

कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे विभाग, जिल्हा परिषद,

किंवा

कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे (स्थानिक स्तर) विभाग,

किंवा

प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.

2) उपसा सिंचन योजनेसाठी आवश्यक ती पाणी परवानगी मागणी सदर लाभधारकांना संबंधित शासकीय यंत्रणेकडून म्हणजे अधिसूचित नदी/नाल्याबाबत पाटबंधारे विभागाच्या संबंधित क्षेत्रिय अधिका-यांकडे किंवा अधिसूचित नसलेल्या नदी-नाल्यांवरील पाण्याबाबत जिल्हाधिका-यांकडे करावी लागेल. त्यानंतर लाभधारकांना संबंधित कार्यालयाकडून पाणी परवानगी पत्र मिळवून ते वर नमूद केलेल्या संबंधित अधिकारी (कार्यकारी अभियंता) यांना सादर करावे लागेल.

3) पाणी परवानगी मिळाल्यानंतर उपलब्ध पाण्यातून किती क्षेत्रात व कोणती पिके घेण्याचे प्रस्तावित आहे, याबाबत लाभधारकांना सर्वेक्षण यंत्रणेस कळवावे लागेल. पाण्याची उपलब्धता असेल तर प्रस्तावित पिक प्रमाण रचनेसाठी त्या योजनेचे लघु पाटबंधारे योजनांचे सर्वेक्षण करणा-या यंत्रणेतर्फे प्राथमिक सर्वेक्षण करण्यात येईल व योजना आर्थिक मापदंडास बसत असेल व तांत्रिक दृष्ट्या योग्य असेल तर त्या परिसराचा नकाशा लाभार्थ्यांना सर्वेक्षण यंत्रणेतर्फे पाठविण्यात येईल. त्या आधारे लाभार्थ्यांना सहकारी संस्था स्थापन करुन नोंदणी करण्यासाठी सहकार विभागाची मान्यता घ्यावी लागेल.

4) सदरहू योजना स्वखर्चाने व्यवस्थापनासाठी व देखभालीसाठी ताब्यात घेण्याबाबत लाभार्थ्यांच्या सहकारी संस्थेने करार केल्यानंतरच सदरहू योजनेस तांत्रिक व प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

5) योजना पूर्ण झाल्यानंतर ती व्यवस्थापनासाठी व देखभालीसाठी लाभार्थ्यांच्या सहकारी संस्थेस देण्यात येईल. ती शासकीय खर्चाने चालविण्यात येणार नाही.

3. <u>तांत्रिक मान्यता</u> :- उपसा सिंचन योजनांचे आराखडे व अंदाजपत्रके यांना प्रशासकीय मान्यता/तांत्रिक मान्यता देण्यापूर्वी ते तयार करतांना किंवा त्यांची छाननी करताना लाभार्थीच्या जमिनीचे क्षेत्र व लाभार्थींची जात/जमात याबाबतची माहिती संबंधित यंत्रणांनी महसुली अधिका-यांकडून घ्यावी.

उपसा सिंचन योजनांची प्राकलने तयार झाल्यानंतर सदर योजनेस तांत्रिक मान्यता देण्यास खालील अधिकारी सक्षम राहतील.

| | | |
|---|---|---|
| (1) रु. 10 लाख पावेतोच्या योजना | - | कार्यकारी अभियंता(सिंचन), जिल्हा परिषद किंवा कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे(स्थानिक स्तर). |
| (2) रु.10 लक्षावरील परंतु रु.25 लक्ष पावेतोच्या योजना. | - | अधिक्षक अभियंता, लघु पाटबंधारे(स्थानिक स्तर)मंडळ. |
| (3) रु.25 लक्षाचे वरील योजना | - | मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे(स्थानिक स्तर), पुणे. |

वरील बाबतीत महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम संहितेत वेळोवेळी केलेली सुधारणा याही बाबतीत लागू राहील.

4. <u>प्रशासकीय मान्यता</u> :- उपसा सिंचन योजनेच्या एकूण सिंचन क्षमतेनुसार त्या योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत जिल्हा परिषद किंवा जलसंधारण विभाग खाली दर्शविलेल्या अधिकारानुसार सक्षम राहतील.

| | | |
|---|---|---|
| (1) 100 हेक्टर पावेतोच्या योजना | - | लघुपाटबंधारे विभाग, जिल्हा परिषद. |
| (2) 101 ते 250 हेक्टर पावेतोच्या योजना | - | लघुपाटबंधारे विभाग (स्थानिक स्तर), जलसंधारण विभाग. |

5. <u>कार्यान्विती यंत्रणा</u>:- 100 हेक्टर पावेतोच्या योजना जिल्हा परिषदेमार्फत कार्यान्वित होतील व 100 हेक्टरपेक्षा जास्त लाभ क्षेत्राच्या योजना जलसंधारण विभागातर्फे कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर) विभागामार्फत कार्यान्वित होतील. जिल्हा परिषदांनी ठरल्यास 100 हेक्टर पावेतोच्या योजनाही जलसंधारण विभागा मार्फत "डिपॉझिट वर्क" म्हणून राबविण्यास हरकत नाही. याकरिता जिल्हा परिषदेने ठराव करुन सदर योजना कार्यान्वित करण्यासाठी कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे(स्थानिक स्तर) विभाग यांचेकडे वर्ग कराव्यात.

6. <u>योजनेचा मापदंड</u> :- उपसा सिंचन योजनेबाबत मापदंड शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्रमांक:मापदं-1092/450/92/लपा-2, दिनांक 11 ऑक्टोबर, 1993 अन्वये निर्धारित केलेले आहेत. तसेच त्यावर शासनाने वेळोवेळी सुधारित केलेले मापदंड लागू राहतील.

7. <u>स्वयंसेवी/सहकारी संस्थेचा सहभाग</u> :- आदिवासी उपयोजना क्षेत्रामध्ये उपसा सिंचन योजना स्वयंसेवी संस्थांमार्फत किंवा सहकारी संस्थांमार्फत कार्यान्वित करुन त्यांचे व्यवस्थापन सदर स्वयंसेवी संस्था/सहकारी संस्थांमार्फत प्रथम तीन वर्ष करण्यास हरकत नाही. त्याकरिता खालील प्रमाणे मार्गदर्शक तत्वे राहतील -

(1) उपसा सिंचन योजनांची प्राकलने स्वयंसेवी संस्था/सहकारी संस्था त्यांना शक्य असल्यास 50 हेक्टर सिंचन क्षमतेपर्यन्तची योजना तयार करण्यास मुभा असेल. मात्र अशा प्राक्कलनांना तांत्रिक मान्यता ही परि.3 मध्ये नमूद केल्याप्रमाणे सक्षम अधिकारी देतील. 50 हेक्टर पेक्षा अधिक सिंचन क्षमतेच्या योजनांची प्राक्कलने शासकीय सर्वेक्षण यंत्रणेमार्फतच करुन घ्यावीत.

(2) मुख्य अभियंता, लघुपाटबंधारे (स्थानिकस्तर)/अधिक्षक अभियंता, लघु पाटबंधारे(स्थानिकस्तर)/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी त्यांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार अशा प्रस्तावास मान्यता देवून सदर योजना स्वयंसेवी संस्थेमार्फत/सहकारी संस्थेमार्फत कार्यान्वित करण्याबाबत परवानगी द्यावी. असे करताना पाटबंधारे विभागाच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून पाण्याच्या उपलब्धतेबाबतचा दाखला मिळाला किंवा कसे तसेच सदर योजना विहित मापदंडात बसते याचीही खात्री करावी. तसेच लाभार्थी पैकी किमान 90% लाभार्थी आदिवासी आहेत याचीही खात्री करुन घ्यावी.

(3) सदर योजनेस मान्यता दिल्यानंतर संबंधित स्वयंसेवी संस्था/सहकारी संस्था, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद/अधिक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिकस्तर) मंडळ यांचे बरोबर करारनामा करतील व सदर योजना किती कालावधीत पूर्ण करावयाची याबाबत कार्य नियोजन आराखडा आखण्यात येईल.

(4) सदर योजना राबवितांना स्वयंसेवी संस्थांना/सहकारी संस्थांना प्रशासकीय खर्च करावा लागणार आहे. जसे प्राक्कलने तयार करणे, योजना कार्यान्वित करताना त्यावर पर्यवेक्षण करणे, योजना लाभार्थ्यांच्या सहकारी संस्थेच्या ताब्यात दिल्यानंतर त्यावर तीन वर्षे पर्यन्त लाभार्थ्यांना मार्गदर्शन करणे इत्यादि खर्च दर्शविण्यासाठी संबंधित स्वयंसेवी संस्था/सहकारी संस्था यांना उपसा सिंचन योजनेच्या निव्वळ किंमतीच्या 5% रक्कम अनुज्ञेय राहील. सदरहू रक्कम खालील प्रमाणे टप्प्या टप्प्याने देण्यात येईल.

अ) टप्पा क्रमांक 1 :- संबंधित उपसा सिंचन योजनेच्या प्रकल्पाचे सर्वेक्षण/प्राकलने पूर्ण होवून सदरहू प्रकल्पास प्रशासकीय मान्यता मिळाल्यानंतर उपसा सिंचन योजनेच्या निव्वळ किंमतीच्या 1% रक्कम अदा करण्यात येईल.

ब) टप्पा क्रमांक 2 :- सदरहू प्रकल्पाचे बांधकाम स्वयंसेवी संस्था/सहकारी संस्थामार्फत पूर्ण होवून पहिल्या वर्षी सिंचनाबाबत प्रत्यक्ष चांचणी देवून प्रकल्प अहवालाप्रमाणे नियोजित सिंचन क्षेत्रास पाणी मिळू शकते हे लाभक्षेत्रावर शासनाच्या संबंधित सक्षम तांत्रिक अधिकारी व अध्यक्ष (लाभार्थी सहकारी संस्था) यांना दाखवून व याबाबत संबंधित शासकीय तांत्रिक सक्षम अधिका-यांचे प्रमाणपत्र सादर केल्यावर उपसा सिंचन योजनेच्या निव्वळ किंमतीच्या 2% रक्कम अदा करण्यात येईल.

क) टप्पा क्रमांक 3 :- सिंचनाच्या दुस-या वर्षी कमीत कमी 60% सिंचन क्षेत्र ओलीताखाली आणल्यानंतर उपसा सिंचन योजनेच्या निव्वळ किंमतीच्या 1% रक्कम अदा करण्यात येईल.

ड) टप्पा क्रमांक 4 :- सिंचनाच्या तिस-या वर्षी कमीत कमी 80% नियोजित क्षेत्र ओलीताखाली आल्यावर उपसा सिंचन योजनेच्या निव्वळ किंमतीच्या 1% रक्कम अदा करण्यात येईल.

(5) सदर योजना स्वयंसेवी संस्था/सहकारी संस्था यांनी कार्यान्वित करतांना त्यांना लाभार्थ्यांकडून सहभाग अपेक्षित आहे. सदर सहभाग रोखीच्या किंवा श्रमदानाच्या स्वरुपात लाभार्थीच्या मालकीच्या लाभक्षेत्रावर रु. 1,000/- प्रति हेक्टर या दरापेक्षा जास्त असता कामा नये. सिंचन व्यवस्थापनेत आवश्यक त्या शेतचा-या तसेच जलनिस्सारण व्यवस्थेसाठी आवश्यक चा-या लाभार्थीनी सामुदायिकरित्या स्वत:च्या खर्चाने करावयाच्या आहेत.

(6) योजनेस प्रशासकीय मान्यता मिळविणे पूर्वी स्वयंसेवी संस्थांनी/सहकारी संस्थांनी लाभार्थ्यांची पाणी वापर सहकारी संस्था स्थापन करुन ती पंजीबद्ध करावी व योजना पूर्ण झाल्यानंतर देखभाल व व्यवस्थापनासाठी योजना लाभार्थीच्या खर्चाने पुढे कार्यान्वित करण्यासाठी लाभार्थ्यांच्या सहकारी संस्थेस हस्तांतरीत करावी. ज्या ठिकाणी लाभार्थ्यांची सहकारी संस्था कमी लाभार्थ्यांमुळे स्थापन करणे शक्य नाही तेथे लाभार्थ्यांचा समुह तयार करुन सदर योजना लाभार्थ्यांच्या समुहाकडे त्यांच्या खर्चाने देखभाल व व्यवस्थापनासाठी देण्यास हरकत नाही. असे करतांना सदर समुहामध्ये स्वयंसेवी संस्थांनी/सहकारी संस्थांनी त्यांचा एक प्रतिनिधी प्रथम प्रकल्प सुरु झाल्यापासून तीन वर्षापर्यन्त ठेवण्यास हरकत नाही. जेणेकरुन योजनांची देखभाल/व्यवस्थापन योग्य प्रकारे होवू शकेल.

(7) स्वयंसेवी/सेवाभावी संस्था जेथे ही योजना बांधून देतील त्यातून निर्माण होणारी मालमत्ता(Assets) हे शासनाचे मालकीचे असतील. त्यात स्वयंसेवी संस्थांची मालकी असणार नाही. व्यवस्थापन संस्था करु शकतील व व्यवस्थापनात स्थानिक लाभधारक शेतक-यांचा सहभाग असेल.

8. स्वयंसेवी संस्था/सहकारी संस्था निवडीबाबत निकष :- स्वयंसेवी संस्था/सहकारी संस्था निवडीबाबत खालील निकष राहतील.

(1) संबंधित संस्था ही सोसायटीच्या कायद्याअंतर्गत नोंदणीकृत असावी.

(2) संबंधित संस्थेला/संस्था प्रमुखाला ग्रामीण भागात विकासाच्या कामांचा पुर्वानुभव असावा.

(3) संबंधित संस्थेची उपसा सिंचन योजना प्रकल्प तयार करण्यासाठी व राबवण्यासाठी क्षमता असावी.

(4) संबंधित संस्था ही शक्यतो त्या जिल्ह्यातील किंवा त्या विभागातील असावी.

9. स्वयंसेवी संस्थांना/सहकारी संस्थांना निधी उपलब्ध करुन देण्याची कार्यपध्दती :- प्रकल्पाच्या एकूण किंमतीच्या अंदाजित रकमेपैकी प्रथम वर्षाच्या अंदाजित खर्चाच्या 20% रक्कम किंवा रुपये 3.00 लक्ष त्यापैकी जी रक्कम कमी असेल, ती अग्रीम निधी म्हणून स्वयंसेवी संस्था/सहकारी संस्थेला मंजूर करण्यात येईल. यानंतर पुढील कालावधीसाठी दर तीन महिन्याला कामाच्या प्रगतीनुसार निधी उपलब्ध करुन दिला जाईल. पहिला अग्रीम निधी मंजूर केल्यानंतर पुढील निधी उपलब्ध करुन देण्यापूर्वी आधी मंजूर केलेल्या अग्रीम निधीपैकी 75% रक्कम खर्च झाल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र व कामाच्या उद्दिष्टपूर्ती संबंधी दाखला देण्यात यावा. हा निधी मागणीचा प्रस्ताव व त्यासोबत प्राप्त झालेले उपयोगिता प्रमाणपत्र व उद्दिष्टपूर्तीचा दाखला प्राप्त झाल्यानंतर आवश्यकतेप्रमाणे त्याची शहानिशा संबंधित उप अभियंता/कार्यकारी अभियंता यांच्याकडून करण्यात येईल व त्यानंतरच पुढील अग्रीम धन मंजूर करण्यात येईल. स्वयंसेवी संस्थांना, सहकारी संस्थांना प्रशासकीय खर्चापोटी खर्चाची 5% रक्कम स्वतंत्ररित्या मंजूर करण्यात येईल.

10. प्रत्यक्ष कामासाठी शासनाकडून मिळणारी उपरोक्त रक्कम ही स्वयंसेवी संस्था/प्रकल्पाच्या लाभार्थ्यांची पंजीकृत संस्था यांचे अध्यक्षांच्या नावे संयुक्त खाते राष्ट्रीयकृत बँकेत उघडून त्या खात्यात जमा करावी व दोन्ही खातेदारांच्या सहीने सदरहू खात्यातील पुढील आर्थिक व्यवहार करावा.

11. स्वयंसेवी संस्था/सहकारी संस्था बरोबर जे करारपत्र करावे लागेल ते शासनाच्या वतीने मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (100 हेक्टर लाभक्षेत्राच्या मर्यादेपर्यन्तच्या योजना) किंवा अधीक्षक अभियंता, लघुपाटबंधारे (स्थानिकस्तर) मंडळ (101 ते 250 हेक्टर लाभक्षेत्राच्या मर्यादेपर्यन्तच्या योजना) हे करतील. वरीलप्रमाणे 250 हेक्टर सिंचन क्षमते पावेतोच्या योजनांबाबत आदिवासी विकास विभाग त्यांच्या लेखाशिर्षांतर्गत संबंधित योजनेकरीता तरतूद उपलब्ध करुन देईल.

12. हा शासन निर्णय आदिवासी विकास विभाग/नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक 6389, दिनांक 24 डिसेंबर 1993 अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अशोक बसाक,
सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
अतिरिक्त मुख्य सचिव,
शासनाचे सर्व प्रधान सचिव/सर्व सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,